राज्यातील प्रशिक्षण संस्थांच्या पुनर्रचनेनंतर नामाभिधानाबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. डायट-४५१७/(प्र.क्र.८४/२०१७)/प्रशिक्षण,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-३२
दिनांक : २४ ऑगस्ट, २०१७

**पहा :-** १. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.आरटीई- २०१३/प्र.क्र.२५/ प्रशि-१, दि.१९ मार्च २०१३
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. शैगुवि-२०१५/(८०/१५)/एसडी-६ दि.२२ जून २०१५
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. याचिका-६२१४/प्र.क्र.१६/एसडी-१ दि. २९ फेब्रुवारी २०१६
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. डायट ४५१६/(४०/१६)/ प्रशिक्षण, दि.१७ ऑक्टोबर २०१६

**पार्श्वभूमी :-**

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे ही राज्य शासनाच्या शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखाली असणारी संस्था आहे. जानेवारी १९६४ मध्ये राज्य शिक्षणशास्त्र संस्था या नावाने प्रामुख्याने राज्यातील शिक्षणाचा दर्जा / गुणवत्ता सुधारण्यासाठी या संस्थेची स्थापना करण्यात आली. राज्य स्तरावर काम करणा-या विविध शासकीय शिक्षण संस्था व राज्य शिक्षणशास्त्र संस्था यांचे एकत्रीकरण करून १९८४ मध्ये राज्य शिक्षणशास्त्र संस्थेचे नामकरण महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे असे करण्यात आले.

बालकाचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिनियम, २००९ मधील कलम २९ नुसार महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे या संस्थेस विद्या प्राधिकरण म्हणून घोषित केले आहे. मा. मुख्यमंत्री यांनी राज्यास गुणवत्तेच्या दृष्टीने राष्ट्रीय पातळीवर प्रथम तीन क्रमांकामध्ये आणण्याचे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने व प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमांतर्गत उद्दिष्ट साध्यतेसाठी राज्य, जिल्हा, तालुका व केंद्र पातळीपर्यंत सशक्त शैक्षणिक सक्षमीकरण व्यवस्था तयार करण्याच्या दृष्टीने संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे व जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांची पुनर्रचना करण्यात आली आहे व सदर शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे या कार्यालयास विद्या प्राधिकरण या नावाने संबोधले आहे.

जिल्ह्यातील प्राथमिक शिक्षणाची गुणवत्ता उंचावणे , जिल्ह्यातील शिक्षकांना प्रशिक्षण देणे यासाठी जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांची स्थापना करण्यात आली. जिल्ह्यातील शिक्षकांना प्रशिक्षणाच्या संधी उपलब्ध करून देणे हे जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थेचे कार्य असल्याने संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयाद्वारे सदर संस्थांना जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था असे संबोधण्यात आले आहे.

याचबरोबर संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयाद्वारे राज्य गणित व विज्ञान संस्था, नागपूर , जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, अमरावती , राज्य आंग्लभाषा संस्था, औरंगाबाद, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, नाशिक व व्यवसाय मार्गदर्शन व निवड संस्था, मुंबई या संस्थांची पुनर्रचना करून प्रादेशिक विद्या प्राधिकरणांची स्थापना करण्यात आली आहे.

सदर नामकरणामध्ये बदल करणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

**विद्या प्राधिकरण :** विद्या प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे या संस्थेस यापुढे महाराष्ट्र विद्या प्राधिकरण, पुणे (Maharasthra Academic Authority, Pune) असे संबोधण्यात येईल. यापुढे प्राधिकरणातील सर्व कार्यवाही व यापुढे सदर संस्थेमार्फत व संस्थेस होणारा पत्रव्यवहार महाराष्ट्र विद्या प्राधिकरण, पुणे या नावानेच होईल. प्राधिकरणाच्या संबंधित सर्व अभिलेखांमध्ये सदर नामाभिधानाप्रमाणे आवश्यक ते बदल करण्यात यावेत.

**जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था :** राज्यातील जिल्ह्यांमध्ये असणाऱ्या जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था यांना यापुढे जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था ( DISTRICT INSTITUTE OF EDUCATIONAL CONTINUOUS PROFESSIONAL DEVELOPMENT - DIECPD) असे संबोधण्यात येईल. यापुढे सदर संस्थेमार्फत होणारी कार्यवाही जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था या नावाने होईल. जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था संबंधित सर्व अभिलेखांमध्ये सदर नामाभिधानाप्रमाणे आवश्यक ते बदल करण्यात यावेत.

**प्रादेशिक विद्या प्राधिकरण** :- राज्यातील प्रत्येक महसूल विभागामध्ये एका प्रादेशिक विद्या प्राधिकरणाची (Regional Academic Authority ) स्थापना करण्यात आली आहे. सदर संस्था त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या नवीन नावाने कार्यरत होतील. यापुढे सदर कार्यालयांमार्फत होणारी कार्यवाही त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या नवीन नावाने होईल. संबंधित सर्व संस्थांच्या अभिलेखांमध्ये सदर नामाभिधानाप्रमाणे आवश्यक ते बदल करण्यात यावेत.

| अ.क्र. | वर्तमान संस्था | पुनर्रचनेनंतर संस्थेचे नवीन नाव | विभाग |
|---|---|---|---|
| १. | राज्य गणित व विज्ञान संस्था, नागपूर | प्रादेशिक विद्या प्राधिकरण, नागपूर | नागपूर |
| २. | जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, अमरावती | प्रादेशिक विद्या प्राधिकरण, अमरावती | अमरावती |
| ३. | राज्य आंग्लभाषा संस्था, औरंगाबाद | प्रादेशिक विद्या प्राधिकरण, औरंगाबाद | औरंगाबाद |
| ४. | जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, नाशिक | प्रादेशिक विद्या प्राधिकरण, नाशिक | नाशिक |
| ५. | व्यवसाय मार्गदर्शन व निवड संस्था, मुंबई | प्रादेशिक विद्या प्राधिकरण, मुंबई | मुंबई |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०८२४१६४४५४८१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39,
serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.08.28 16:08:26 +05'30'

**( नंद कुमार )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत माहितीस्तव**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर
५) महालेखापाल (लेखा व परीक्षा ), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर
६) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) संचालक, महाराष्ट्र विद्या प्राधिकरण, पुणे
१०) संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, बालभारती, पुणे
११) संचालक, प्रौढ व अल्पसंख्याक संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, बालचित्रवाणी शेजारी, आगरकर रिसर्च इन्स्टिट्यूटच्या मागे, भांबुर्डा, शिवाजी नगर, पुणे
१३) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परीषद, पुणे.
१४) जिल्हाधिकारी ( सर्व)
१५) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७) संचालक, महाराष्ट्र शैक्षणिक नियोजन व प्रशासन संस्था, औरंगाबाद.
१८) प्रादेशिक विद्या प्राधिकरण, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, नाशिक, मुंबई
१९) संचालक, राज्य आंग्ल भाषा संस्था, औरंगाबाद
२०) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व विभाग)
२१) प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपुर्ण व्यावसायिक विकास संस्था (सर्व)
२२) शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / निरंतर), जिल्हा परिषद (सर्व)
२३) शिक्षण निरीक्षक, (दक्षिण / उत्तर / पश्चिम), बृह्नमुंबई
२४) शिक्षण प्रमुख / शिक्षणाधिकारी / प्रशासन अधिकारी, महानगरपालिका (सर्व)
२५) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).